महा-कॅम्पा प्राधिकरणास मागील आर्थिक वर्षामध्ये वितरीत केलेल्या रकमेपैकी अखर्चित निधीचा सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात वापर करण्यास परवानगी देणेबाबत...

## महाराष्ट्र शासन

### महसूल व वन विभाग

### शासन निर्णय क्रमांकः कॅम्पा-२०२४/प्र.क्र.७०/फ-१०

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २७.०३.२०२५.

वाचा:-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) सुकाणी समिती, महाराष्ट्र पर्यायी वनीकरण निधी व्यवस्थापन व नियोजन प्राधिकरण (महा कॅम्पा) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या दिनांक ११.०९.२०२४ च्या बैठकीचे इतिवृत्त
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी (महा-कॅम्पा), नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-कॅम्पा/प्र.क्र.२७/२०२३-२४/५९२, दि. २१.१२.२०२४

प्रस्तावना:-

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी (महा-कॅम्पा), नागपूर यांनी महाराष्ट्र पर्यायी वनीकरण निधी व्यवस्थापन व नियोजन प्राधिकरण (महा कॅम्पा) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना मागील आर्थिक वर्षात वितरीत केलेल्या निधीमधील अखर्चित निधीपैकी रु. १७५,७३.०१ लक्ष इतका निधी सन २०२४-२५ या वर्षाच्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील कामांवर खर्च करण्यासाठी मंजूरी देण्याची विनंती केली आहे. वित्त विभागाने सदर मागील अखर्चित निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात खर्च करण्यास मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने रू.१७५,७३.०१ लक्ष एवढा अखर्चित निधी खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

महा-कॅम्पा प्राधिकरणास मागील आर्थिक वर्षामध्ये वितरीत केलेल्या निधीमधील अखर्चित निधीपैकी रु.१७५,७३.०१ लक्ष इतका निधी सन २०२४-२५ या वर्षाच्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतुदीनुसार खालील लेखाशीर्षांतर्गत खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

(१) महा-कॅम्पा प्राधिकरणांतर्गत पर्यायी वनीकरणाअंतर्गत होणारा खर्च रु. ५०,१०.५१ लक्ष च्या मर्यादेत मागणी क्र. सी-७, २४०६ - वनीकरण व वन्यजीवन, ०४ - वनीकरण व परिस्थितीकीय विकास, १०३ - राज्य पर्यायी वनीकरण, (०१) - राज्य प्राधिकरण, (०१) (०१) पर्यायी वनीकरण (अनिवार्य) (५० - इतर खर्च) संकेतांक -२४०६ ए ५४१, या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

(२) महा-कॅम्पा प्राधिकरणांतर्गत एकात्मिक वन्यजीव व्यवस्थापन आराखडयाची अंमलबजावणी अंतर्गत होणारा खर्च रु. १.१५ लक्ष च्या मर्यादेत मागणी क्र. सी-७, २४०६ - वनीकरण व वन्यजीवन, ०४ - वनीकरण व परिस्थितीकीय विकास, १०३ - राज्य पर्यायी वनीकरण, (०१) - राज्य प्राधिकरण, (०१) (०३) एकात्मिक वन्यजीव व्यवस्थापन आराखडयाची अंमलबजावणी (अनिवार्य) (५० - इतर खर्च), संकेतांक - २४०६ ए ६८६, या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

(३) महा-कॅम्पा प्राधिकरणांतर्गत नक्त वर्तमान मूल्य अंतर्गत होणारा खर्च रु. ११०,५९.७० लक्ष च्या मर्यादेत मागणी क्र. सी-७, २४०६ - वनीकरण व वन्यजीवन, ०४ - वनीकरण व परिस्थितीकीय विकास, १०३ - राज्य पर्यायी वनीकरण, (०१) - राज्य प्राधिकरण, (०१) (०४) नक्त वर्तमान मूल्य (अनिवार्य) (५० - इतर खर्च), संकेतांक - २४०६ ए ६९५, या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

(४) महा-कॅम्पा प्राधिकरणांतर्गत व्याज अंतर्गत होणारा खर्च रु. ५३०.०० लक्ष च्या मर्यादेत मागणी क्र. सी-७, २४०६ - वनीकरण व वन्यजीवन, ०४ - वनीकरण व परिस्थितीकीय विकास, १०३ - राज्य पर्यायी वनीकरण, (०१) - राज्य प्राधिकरण, (०१) (०५) व्याज (अनिवार्य) (५० - इतर खर्च), संकेतांक -२४०६ ए ७०१, या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

(५) महा-कॅम्पा प्राधिकरणांतर्गत इतर अंतर्गत होणारा खर्च रु. ९७१.६५ लक्ष च्या मर्यादेत मागणी क्र. सी-७, २४०६ - वनीकरण व वन्यजीवन, ०४ - वनीकरण व परिस्थितीकीय विकास, (०१) (०६) इतर (अनिवार्य) (५० - इतर खर्च), संकेतांक - २४०६ ए ७१२, या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

२. महाराष्ट्र पर्यायी वनीकरण निधी व्यवस्थापन व नियोजन प्राधिकरण (महा कॅम्पा) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधीचा सुयोग्य विनियोजन होण्यासाठी आगामी वित्तीय वर्षात या निधीतून घ्यावयाच्या कामांचे आराखडे पहिल्या तिमाहीतच अंतिम करावेत.

३. महाराष्ट्र पर्यायी वनीकरण निधी व्यवस्थापन व नियोजन प्राधिकरण (महा कॅम्पा) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे अखर्चित असलेल्या निधीवरील आजतागायत प्राप्त झालेल्या व्याजाची रक्कम महा कॅम्पा खात्याच्या संबंधित लेखाशिर्षामध्ये तात्काळ जमा करावी.

४. सदरचा अखर्चित निधी दिनांक ३१.०३.२०२५ पूर्वी खर्च होईल या दृष्टीने कामाचे नियोजन करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी (महा-कॅम्पा), नागपूर यांची राहील.

५. दिनांक ३१.०३.२०२५ अखेर अखर्चित असलेला निधी दिनांक ३१.०३.२०२५ रोजी महा-कॅम्पा खात्यामध्ये जमा करणे बंधनकारक राहील.

६. सदर मुदतीत अखर्चित निधी महा-कॅम्पा खात्यामध्ये जमा न केल्यास त्यास जबाबदार असलेल्या संबंधित अधिकारी यांच्याविरुध्द कारवाई करण्यात येईल. सदर मुदतीत अखर्चित निधी महा-कॅम्पा खात्यामध्ये जमा करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी (महा-कॅम्पा), नागपूर यांची राहील.

७. सदरचा खर्च उक्त नमूद लेखाशीर्षामध्ये मान्यता दिल्यानुसार सन २०२४-२५ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यामध्ये मंजूर बाबींव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबींवर / नवीन क्षेत्रावर / नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही. कामची द्विरुक्ती होणार नाही याची दक्षता घ्यावी तसेच खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याचीही दक्षता संबंधित जबाबदार अधिकारी यांनी घ्यावी. सदर वितरीत केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर केले जाईल, याची दक्षता संबंधित जबाबदार अधिकारी यांनी घ्यावी.

८. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

९. जिल्हानिहाय व लेखाशीर्षनिहाय वितरीत तरतुदीची व राबविण्यात आलेल्या कामाची माहिती / झालेल्या खर्चाचा तपशील शासनास विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा.

१०. महा-कॅम्पा प्राधिकरणाअंतर्गत होणारा खर्च उक्त नमूद लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेल्या अखर्चित निधीतून वित्त विभागाच्या संदर्भीय दि.०१.०४.२०२५ व वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन परिपत्रक / निर्णयातील सूचनांस अनुसरून खर्ची टाकण्यात यावा.

११. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.०४/व्यय-१०, दि.०७.०१.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२७१९३३१३३८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH TUKARAM JADHAO

Digitally signed by GANESH TUKARAM JADHAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0078f58512d3ac01315bbbfa4b473ed7729dd2d31644106e2966ab9ee6e92d7d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6FEEDE606678D569A76B842319BD1C2969AA85BBA5CDCCEE147249F17965E8BB, cn=GANESH TUKARAM JADHAO
Date: 2025.03.27 19:33:55 +05'30'

**(गणेश जाधव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा., नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व मुख्य कार्यकारी अधिकारी, महा-कॅम्पा, नागपूर.
४. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १ / २ , मुंबई / नागपूर.
५. सहसचिव, अर्थोपाय / व्यय-१० / अर्थसंकल्प-६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. कार्यासन अधिकारी, ब-१ / फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. निवडनस्ती/फ-१०.